**नागपूर येथील दोन अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे व १२ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र.एमसीटी-०३२४/प्र.क्र.५३/परिवहन-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १ एप्रिल, २०२४.

**वाचा :** १) शासन अधिसूचना क्र. एमसीटी-०८०५/सीआर-१५४/परि-५, दिनांक १८.११.२००५.

२) शा. नि., गृह विभाग क्र.एमसीटी-०२०५/२५५/प्र.क्र.४०/परि.-५, दिनांक २३.११.२००५.

३) शा.नि.क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.७९/परिवहन-५, दिनांक २५.०९.२०२३.

४) सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर यांचे पत्र क्र. ३००/२०२४, दिनांक ०५.०३.२०२४ रोजीचे पत्र.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४.

**प्रस्तावना :**

वरील संदर्भ क्र.१ येथील शासन अधिसूचनेन्वये नागपूर जिल्ह्यासाठी अतिरिक्त दोन मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे दोन वर्षाकरिता स्थापन करण्यात आली आहेत. सदर न्यायाधिकरणांकरिता संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एकूण १२ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत. संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये २ अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे व १२ अस्थायी पदांना दिनांक ०१.०९.२०२३ ते २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर १२ पदांची मुदतवाढ दिनांक २९.०२.२०२४ रोजी संपुष्टात आली असल्याने तसेच संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०५.०३.२०२४ च्या पत्रान्वये सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, नागपूर यांनी दोन अतिरिक्त न्यायाधिकरणांना व त्यातील एकूण १२ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला असल्याने उक्त पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर येथे स्थापन करण्यात आलेली दोन अतिरिक्त मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे व त्याकरिता निर्माण करण्यात आलेल्या १२ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरित निकाली काढण्याच्या तसेच निकाली काढलेल्या दाव्यांचे विवरणपत्र प्रत्येक तीन महिन्यानंतर शासनास सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

मुदतवाढ देण्यात येत असलेल्या अस्थायी पदांचा तपशील पुढीलप्रमाणे:-

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्र. व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | सदस्य | २ | शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी ०२०५/२५५/ प्र.क्र.४०/परि-५, दि. २३.११.२००५ |
| २. | उच्च श्रेणी लघुलेखक | २ | वरीलप्रमाणे. |
| ३. | वरिष्ठ श्रेणी लिपिक | २ | वरीलप्रमाणे. |
| ४. | कनिष्ठ श्रेणी लिपिक | २ | वरीलप्रमाणे. |
| ५. | हवालदार | २ | वरीलप्रमाणे. |
| ६. | शिपाई | २ | वरीलप्रमाणे. |
| **एकूण पदे** | | **१२** | |

**२.** उपरोक्त प्रयोजनावरील खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१-वाहनांवरील कर, (००), ८००-इतर खर्च, (००) (०१)-मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** हा शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०४०११७५५०५८७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

MADKAR PRATAP SAMPATRAO

Digitally signed by MADKAR PRATAP SAMPATRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=691ba5cde50be5ad4d70b5410e666a3f513b4fd3934f0227b3aab4ff49ee9941, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B6C9D92AA5599BE94C2F37BF0363AAF3D243DE73A6A2F15A0AE751006929371A, cn=MADKAR PRATAP SAMPATRAO
Date: 2024.04.01 18:04:39 +05'30'

**( प्रताप माडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा विभाग प्रमुख, मुंबई.
२. मा.अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तथा प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर.
३. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील साईड), मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
६. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
७. गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/ परिवहन-५.